**शासकीय कार्यालयामध्ये अधिकाराचे प्रदान**

**सादरीकरणाचे टप्पे कमी करण्याबाबत...**

## महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग

शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२०१२/प्र.क्र.५४/१८(र. व का.)

मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

तारीख: ११ ऑगस्ट, २०१४

**शासन परिपत्रक-**

शासकीय कार्यालयात पारदर्शकता व गतीमानता आणण्याच्या दृष्टीने "महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५" हा राज्यात लागू करण्यात आलेला आहे. त्याच प्रमाणे या अधिनियमातील प्रकरण ३ करीता "शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध नियम २०१३" तयार करण्यात आले असून ते दिनांक १४ नोव्हेंबर, २०१३ च्या अधिसूचनेद्वारे राज्यात लागू करण्यात आले आहेत. तद्अनुषंगाने कार्यवाही करणे सर्व शासकीय कार्यालयांना बंधनकारक आहे. यासाठी मंत्रालयीन विभाग तसेच सर्व क्षेत्रिय कार्यालयामध्ये सादरीकरणाचे टप्पे कमी करणे याबाबतच्या कार्यवाही संदर्भात पुढील प्रमाणे कार्यवाही करण्याच्या सूचना देण्यात येत आहेत.

मंत्रालयीन प्रशासकीय विभाग तसेच इतर क्षेत्रिय कार्यालयामध्ये फाईल निर्णयार्थ सादर करण्यासंदर्भात पुढील प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

(i) अधिनियमातील तरतूदीनुसार दुय्यम अधिका-यांकडे सोपविण्यात आलेल्या अधिकारांची यादी त्वरित प्रसिध्द करावी.

(ii) मंत्रालयीन प्रशासकीय विभाग व इतर शासकीय कार्यालये यांनी निर्णयार्थ फाईल सादर करण्याच्या कार्यपध्दतीचे पुनर्विलोकन करावे व त्यामध्ये गतीमानतेच्या दृष्टीकोनातून आवश्यक बदल मान्यतेसाठी कार्यालय प्रमुख/विभागप्रमुखांकडे प्रस्तावित करण्यात यावेत.

(iii) प्रत्येक विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख यांच्या मान्यतेने संबंधित विभाग/ कार्यालयाने प्रकरण/फाईल निर्णयार्थ सादर करण्या करिता तीन स्तर निर्धारित करावेत.

परंतु मंत्रिमंडळ टिप्पणी आणि धोरणात्मक निर्णयाचा समावेश असलेल्या बाबी यासारख्या महत्त्वाच्या बाबीसाठी तीनपेक्षा अधिक स्तर ठेवण्यात यावेत.

(iv) अधिकाऱ्यांच्या साखळीमधील अधिकारी यांना फाईल निर्णयार्थ सादर करण्याचे टप्पे कमी करण्यासाठी शक्य तेथे सादरीकरणा करिता विषय नेमून देण्यात यावेत. उदा. मंत्रालयीन प्रशासकीय विभागात ज्या ठिकाणी अवर सचिव पर्यवेक्षीय अधिकारी आहेत, त्या ठिकाणी कार्यासनातील विषय निश्चित करून त्या विषयासंबंधीच्या नस्त्या कक्ष अधिकारी यांना वगळुन अवर सचिवांमार्फत थेट वरिष्ठांना सादर कराव्यात. तर काही विषय निश्चित करून त्या विषयासंबंधीच्या नस्त्या अवर सचिवांना वगळुन कक्ष अधिकारी यांचे मार्फत थेट वरिष्ठांना सादर कराव्यात.

( अवर सचिव → उप सचिव → सचिव **किंवा**
कक्ष अधिकारी → उप सचिव → सचिव )

अशाच प्रकारे या धर्तीवर अन्य क्षेत्रिय कार्यालयात सादरीकरणाचे स्तर निश्चित करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

(v) मंत्रालयीन प्रशासकीय विभाग तसेच इतर शासकीय कार्यालयातील सहायक / प्रमुख लिपिक/ वरीष्ठ लिपिक/ लिपिक इ .वर्ग ३ च्या कर्मचाऱ्यांकडून फाईल निर्णयार्थ टिप्पणीसह सादर केल्या जातात त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी. मात्र अशा कर्मचाऱ्यांकडून एक वरीष्ठ टप्पा वगळून त्यावरील अधिकाऱ्यांना थेट सादरीकरण करण्याचे निर्देश देता येणे शक्य असल्यास प्रकरणपरत्वे त्या प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

२. वरील निर्देशासंदर्भात काही सूचना करावयाच्या असल्यास त्या सामान्य प्रशासन विभागाकडे हे परिपत्रक प्राप्त झाल्यापासून एक महिन्याच्या आत पाठविण्यात याव्यात.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८११११५२३९१३०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prem Singh Meena

Digitally signed by Prem Singh Meena
DN: c=IN, o=all india services, ou=IAS, postalCode=110003, st=New Delhi, cn=Prem Singh Meena
Date: 2014.08.11 11:51:28 +05'30'

(डॉ. पी. एस. मीना)

अपर मुख्य सचिव (प्र.सु. र. व का.)

**प्रत,**

१) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

२) सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य,

३) मा. राज्यपालांचे सचिव

४) मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव

५) मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव

६) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहाय्यक,

७) शासनाचे मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,

८) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,

९) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.

१०) सर्व मंत्रालयीन विभाग, - त्यांना विनंती करण्यात येते की, उपरोक्त सुचना त्यांनी त्यांच्या सर्व क्षेत्रिय कार्यालयांच्या निर्दशनास आणाव्यात.

११) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.

१२) सर्व विभागीय आयुक्त,

१३) सर्व जिल्हाधिकारी,

१४) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

१५) मंत्रालयीन प्रशासकीय विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभागप्रमुख / प्रादेशिक प्रमुख / कार्यालय प्रमुख.

१६) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,

१७) निवड नस्ती (कार्यासन १८)